**प्रादेशिक परिवहन कार्यालय, मुंबई (मध्य) या कार्यालयाकरिता GeM पोर्टलवरुन ३० संगणक संच खरेदी करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०९१८/प्र.क्र.१९७/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : १९ जानेवारी २०१९

वाचा :

1) **उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दि.०१.१२.२०१६**
2) **उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४.०८.२०१७**
3) **परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.पआका /का.११ /संगणक /हार्डवेअर खरेदी/मुंबई (म)२०१८/जा.क्र.१३३९३, दि.१४.०९.२०१८, जा.क्र.१५७३५, दि.१२.११.२०१८ व जा.क्र.१६६७५, दि.०६.१२.२०१८**
4) **गृह विभाग,शासन निर्णय क्र. गृहआ-२०१५/प्र.क्र.२३०/आस्थापना-२, दि.२०.०५.२०१५**
5) **प्रकल्प अंमलबजावणी समितीची दि.२७.०९.२०१८ रोजी झालेली बैठक**

**प्रस्तावना :**

प्रादेशिक परिवहन अधिकारी मुंबई (मध्य) यांच्या कार्यालयात दि.०५.०८.२०१८ रोजी लागलेल्या आगीमध्ये कार्यालयातील "सी-ब्लॉक" मधील नविन अनुज्ञप्ती विभागातील सर्व अभिलेख,३० संगणक संच, प्रिंटर, सर्व्हर इ. पूर्णपणे जळून खाक झाले . कार्यालयातील वाहन अनुज्ञप्तीविषयक कामकाज हे राष्ट्रीय सूचना केंद्र यांनी विकसित केलेली वेब आधारित वाहन/सारथी ४.० संगणक प्रणालीच्या माध्यमातून करण्यात येते. त्यामुळे , प्रादेशिक परिवहन कार्यालय,मुंबई (मध्य) येथे अनुज्ञप्तीविषयक कामकाज करण्यासाठी GeM पोर्टलवरुन ३० संगणक संच खरेदी करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

प्रादेशिक परिवहन कार्यालय, मुंबई (मध्य) या कार्यालयाकरीता GeM पोर्टलवरुन ३० संगणक संच खरेदी करण्यास व त्यासाठी येणा-या रुपये १२,००,०००/- (अक्षरी रुपये बारा लक्ष फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरची खरेदी खरेदी करताना उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि.०१.१२.२०१६ व दि.२४.०८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. माहिती तंत्रज्ञान विभागाने विहित केलेल्या विनिर्देशानुसार ( Specifications)तसेच शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या खरेदीबाबतच्या अटी व शर्तीनुसार व GeM पोर्टलवरील अटी व शर्ती नुसार खरेदी प्रक्रियेची कार्यपद्धती अवलंबवावी.

३. यासाठी येणारा खर्च हा “मागणी क्र. बी-३, लेखाशीर्ष २०४१, वाहनांवरील कर (०१) (०४) कार्यालयीन अभिलेखांचे संगणकीकरण (मोटार वाहन आणि मोटार अपघात दावा न्यायाधिकरण) (२०४१ ०२९७), १३ कार्यालयीन खर्च” या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदरहू शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, मधील भाग- पहिला, उप विभाग-दोन मधील अनुक्रमांक२७-अ, नियम ७६ अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या पूर्ण अधिकारानुसार व दि.२७.०९.२०१८ रोजी झालेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११९१४५३१८५२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2019.01.19 14:59:45 +05'30'

**( द.ह.कदम )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. परिवहन उप आयुक्त (प्रशासन/संगणक/लेखा) परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
७. प्रादेशिक परिवहन कार्यालय, मुंबई (मध्य)
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१०.अवर सचिव (माहिती व तंत्रज्ञान) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
११.अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवड नस्ती (परिवहन-४)